**बाळापूर, जिल्हा अकोला येथे मा.दिवाणी न्यायाधीश (क.स्त.) व न्यायदंडाधिकारी प्रथमश्रेणी यांचेसाठी एक निवासस्थान बांधण्याबाबत.**

**महाराष्ट्र शासन**
**विधि व न्याय विभाग,**
**शासन निर्णय क्र.सीआरक्यू-१२२१/प्र.क्र.१०३/का-१३,**
मादाम कामा मार्ग, हुतात्मा राजगुरू चौक,
मंत्रालय, मुंबई-४०० ०३२,
दिनांक :- १९ जानेवारी २०२२

**पहा :-** प्रबंधक (निरिक्षणे-२), उच्च न्यायालय, अपिल शाखा, मुंबई यांचे क्र. बी (डब्ल्यू) ६००१/२००८(३२)/११७४२१, दिनांक १३ डिसेंबर, २०२१ चे पत्र.

**प्रस्तावना:-**

बाळापूर, जिल्हा अकोला येथे मा.दिवाणी न्यायाधीश (क.स्त.) व न्यायदंडाधिकारी प्रथमश्रेणी यांचेसाठी एक निवासस्थान बांधण्याबाबतचा प्रस्ताव मा. उच्च न्यायालय, मुंबई यांनी उपरोक्त संदर्भाधीन पत्रान्वये शासनास सादर केला आहे. सदरहू प्रस्तावास प्रशासकीय मान्यता देण्याची बाब शासनाच्या विचाराधीन होती.

**शासन निर्णय :-**

बाळापूर, जिल्हा अकोला येथे दिवाणी न्यायाधीश (क.स्त.) व न्यायदंडाधिकारी प्रथमश्रेणी यांचेसाठी एक निवासस्थान बांधण्याकरिता रु.७५,००,०००/- (रुपये पंच्याहत्तर लक्ष फक्त) इतक्या अंदाजित खर्चाच्या कामास (खाली नमूद केलेल्या विगतवारीनुसार) या शासन निर्णयाद्वारे प्रशासकीय मान्यता देण्यात येत आहे.

| अ.क्र. | तपशिल | प्रशासकीय मान्यता रुपयात |
|---|---|---|
| अ) | आवश्यक बाबी | |
| १ | तळ मजला | २९,७९,०२४.०० |
| २ | रेन वॉटर हार्वेस्टिंग | ५०,०००.०० |
| ३ | पाणी पुरवठा आणि मलनिस्सारण | १,४८,९५१.०० |
| ४ | अंतर्गत विद्युतीकरण | १,७८,७४१.०० |
| ५ | बाह्य विद्युतीकरण | १,४८,९५१.०० |
| ब) | संकिर्ण बाबी | |
| ६ | कंपाऊंड वॉल | ८,२५,०००.०० |
| ७ | गेट | १५,०००.०० |
| ८ | अंतर्गत रस्ते | ८,४०,०००.०० |
| ८ | भूविकास | १,००,०००.०० |
| ९ | वाहनतळ | २,००,०००.०० |

| | | |
|---|---|---|
| १० | लँडस्केपिंग | ३०,०००.०० |
| ११ | भू परिक्षण व डिटेल सर्व्हे | २०,०००.०० |
| १२ | सीसी ड्रेन ॲन्ड सीडी वर्क | २,००,०००.०० |
| **क)** | **वैकल्पीक बाबी** | |
| १३ | वॉटर स्टोरेज आणि बोअरवेल | २,००,०००.०० |
| १४ | एरिया लाईटिंग पंप | १,००,०००.०० |
| **ड)** | **इतर तरतूदी** | |
| १५ | भाववाढ (बांधकामाच्या ५%) | १,४८,९५१.०० |
| १६ | वस्तू व सेवा कर (प्रकल्प खर्चाच्या १२%) | ७,२४,२८०.०० |
| १७ | भाववाढ (प्रकल्प खर्चाच्या १०%) | ६,०३,५६७.०० |
| | **एकूण प्रकल्प किंमत (अ+ब+क+ड)** | **७५,१२,४६५.००** |
| | **म्हणजेच** | **७५,००,०००/-** |

२. ही प्रशासकीय मान्यता खालील अटींच्या अधीन राहून देण्यात येत आहे.

अ) काम सुरु करण्यापूर्वी नमुना नकाशा, मांडणी नकाशा तसेच विस्तृत नकाशास वास्तुविशारदांकडून मंजूरी घेऊनच सुरु करावे.

ब) ढोबळ स्वरुपात धरण्यात आलेल्या तरतुदीबाबत काम करतेवेळी विस्तृत अंदाजपत्रक करुनच काम हाती घ्यावे.

क) प्रत्यक्ष काम करतेवेळी पर्यावरण विभाग, शासन निर्णय क्र. इएनव्ही-२०१३ / प्र.क्र.१७७/तां.क.१, दिनांक १० जानेवारी, २०१४ मध्ये उल्लेख करण्यात आलेल्या मार्गदर्शक तत्वांनुसार कार्यवाही करण्यात यावी.

ड) काम सुरू करण्यापुर्वी सर्व संबंधित स्थानिक संस्था/प्राधिकरणे यांची मान्यता घेण्यात यावी.

इ) सार्वजनिक बांधकाम विभागाच्या शासन निर्णय क्र. बीडीजी २०१७/प्र.क्र.६०/ इमारती-२, दिनांक ७ जुलै, २०१७ अन्वये कार्यवाही करण्यात यावी.

ई) फर्निचरच्या बाबी तसेच मांडणीबाबत उपभोक्ता विभागाच्या वतीने प्रमुख जिल्हा व सत्र न्यायाधिश यांची मान्यता घेतल्यानंतरच निविदा कार्यवाही करावी.

३. या प्रित्यर्थ होणारा खर्च उपरोक्त कामासाठी ""मागणी क्र. एच-७, ४२१६, गृहनिर्माणावरील भांडवली खर्च -०१ शासकीय निवासी इमारती- ७००, इतर गृहनिर्माण, (०१) न्यायदान- केंद्रपुरस्कृत योजना, राज्यहिस्सा (०१) (०१) मोठी बांधकामे (कार्यक्रम) (४२१६ ०२९१) व केंद्र हिस्सा (०३) (०४) मोठी बांधकामे- ५३ मोठी बांधकामे (कार्यक्रम) (४२१६०५२२)" या लेखाशिर्षाखाली मंजूर नियतव्ययातून त्या-त्या आर्थिक वर्षात खर्ची टाकण्यात यावा. मात्र, अर्थसंकल्पात तरतूद केल्याशिवाय कामास सुरुवात करण्यात येऊ नये.

४. हे आदेश सार्वजनिक बांधकाम विभाग, परिपत्रक, क्र.संकिर्ण-२०१९/प्र.क्र.१०/इमा-२, दिनांक २५ सप्टेंबर, २०१९ अन्वये मा. मुख्य अभियंता, अमरावती यांनी दिलेल्या तांत्रिक मान्यतेनुसार तसेच, नियोजन विभाग, परिपत्रक, क्र.ससमा-२०१०/प्र.क्र.४८/भाग-१/का-१४६१, दिनांक ११ जून, २०१८ मध्ये नमूद केल्यानुसार विभागास असलेल्या अधिकारानुसार व वित्त विभाग शासन निर्णय क्र. विअप्र-२०१३/प्र.क्र.३०/१३/विनियम, भाग-२ दिनांक १७ एप्रिल, २०१५ सोबतच्या परिशिष्टातील वित्तीय अधिकार नियम पुस्तिका, १९७८ भाग पहिला, उपविभाग-पाच, अनुक्रमांक १, महाराष्ट्र सार्वजनिक बांधकाम नियम पुस्तिकेतील परिच्छेद क्र. १३४ अनुसार प्रशासकीय विभागास प्रदान केलेल्या अधिकारान्वये संबंधित सक्षम प्राधिकाऱ्यांच्या मान्यतेने निर्गमित करण्यात येत आहेत.

५. सदर शासन निर्णय महाराष्ट्र शासनाच्या www.maharashtra.gov.in या संकेतस्थळावर उपलब्ध करण्यात आला असून त्याचा सांकेताक २०२२०११९१७०६२९४३१२ असा आहे. हा आदेश डिजिटल स्वाक्षरीने साक्षांकित करुन काढण्यात येत आहे.

**महाराष्ट्राचे राज्यपाल यांच्या आदेशानुसार व नांवाने,**

NITIN V JIWANE

Digitally signed by NITIN V JIWANE
DN: c=IN, o=GOVERNMENT OF MAHARASHTRA, ou=LAW AND JUDICIARY DEPARTMENT, postalCode=400032, st=Maharashtra, 2.5.4.20=eaafa52b8f5b995089773c42d6ed2475cd061a337b724d471400fbcfb074e051, pseudonym=00D295F198C67FDB7031897066C5804DA623172E, serialNumber=38DA45FC182DE9210D4220CD41371018A4D6F00892E5D1478CBA8413AFB06C03, cn=NITIN V JIWANE
Date: 2022.01.19 17:07:45 +05'30'

**( नितिन वि. जिवने )**

**विधि सल्लागार नि सह सचिव, महाराष्ट्र शासन.**

**प्रति,**

१) मा. सभापती, विधान परिषद, महाराष्ट्र विधानमंडळ सचिवालय,मुंबई.
२) मा.अध्यक्ष, विधानसभा, महाराष्ट्र विधानमंडळ सचिवालय,मुंबई.
३) मा. विरोधी पक्ष नेता, विधान परिषद/ विधानसभा ,महाराष्ट्र विधानमंडळ सचिवालय,मुंबई.
४) महाप्रबंधक, उच्च न्यायालय, मुंबई,
५) प्रबंधक बी (डब्ल्यू ) शाखा, उच्च न्यायालय, अपिल शाखा, मुंबई,
६) प्रमुख जिल्हा व सत्र न्यायाधीश, अकोला.
७) महालेखापाल (लेखा व अनुज्ञेयता)/ (लेखापरीक्षा) महाराष्ट्र-एक/दोन, मुंबई व नागपूर,
८) अधिक्षक अभियंता, सार्वजनिक बांधकाम मंडळ, अकोला.
९) कार्यकारी अभियंता, सार्वजनिक बांधकाम विभाग, अकोला. (मूळ अंदाजपत्रक व आराखडे यांच्यासह)
१०) सहायक अभियंता श्रेणी-१,सार्वजनिक बांधकाम उपविभाग, जिल्हा अकोला
११) जिल्हा कोषागार अधिकारी, अकोला.
१२) सार्वजनिक बांधकाम विभाग (इमा-२), मंत्रालय, मुंबई-४०० ०३२,
१३) वित्त विभाग/व्यय-५, मंत्रालय, मुंबई-४०० ०३२,
१४) नियोजन विभाग,१४४३, मंत्रालय, मुंबई-४०० ०३२,

१५) अपर आयुक्त व सदस्य सचिव, उर्वरित महाराष्ट्र वैधानिक विकास मंडळ, १८ वा मजला, नवीन प्रशासकीय भवन, मंत्रालयासमोर, मुंबई-४०० ०३२.

१६) महासंचालक, माहिती व जनसंपर्क संचालनालय, मंत्रालय, मुंबई-४०० ०३२,

१७) कक्ष अधिकारी, का. ११ व १२, विधि व न्याय विभाग, मंत्रालय, मुंबई-४०० ०३२,

१८) निवड नस्ती/संग्रहार्थ.